न्यायिक अधिकारी प्रशिक्षण संस्था, नागपूर
या संस्थेच्या आस्थापनेवरील अस्थायी
पदांना मुदतवाढ देण्याबाबत .

# महाराष्ट्र शासन
## विधि व न्याय विभाग
**शासन निर्णय क्रमांक न्याअप्र १५१८/प्र.क्र.४५/का- नऊ**
मंत्रालय, मुंबई -४०० ०३२.
दिनांक : ०३ ऑक्टोबर, २०१८.

**पहा -** १) विधि व न्याय विभाग, शासन निर्णय क्र: न्याअप्र १५१८/ प्र.क्र.४५/का-नऊ, दि.१६.०३.२०१८.
२) न्यायिक अधिकारी प्रशिक्षण संस्था, नागपूर यांचे पत्र जा.क्र.७१०/JOTI/२०१८, दि.१९.०९.२०१८.
३) वित्त विभाग, शासन निर्णय क्र. पदनि-२०१६/प्र.क्र.०८/१६/आ.पु.क, दि.०७.०९.२०१८.

**प्रस्तावना :-**

न्यायिक अधिकारी प्रशिक्षण संस्था, नागपूर यांच्या आस्थापनेवरील ३ अस्थायी पदांना संदर्भ क्र.१च्या शासन निर्णयान्वये दि. ३०.०९.२०१८ पर्यंत मुदतवाढ देण्यात आली होती. संदर्भ क्र २ च्या पत्रान्वये सहसंचालक, न्यायिक अधिकारी प्रशिक्षण संस्था, नागपूर यांनी त्यांच्या आस्थापनेवरील ०३ अस्थायी पदांना पुढील मुदतवाढ देण्यासंबंधी विनंती केली आहे. संदर्भ क्र. ३ येथील वित्त विभागाच्या शासन निर्णयान्वये दि.०१.१०.२०१८ ते दि.२८.०२.२०१९ पर्यंत अस्थायी पदांना मुदतवाढ देण्याचे अधिकार प्रशासकीय विभागास प्रदान करण्यात आलेले आहेत. त्यानुसार न्यायिक अधिकारी प्रशिक्षण संस्था, नागपूर येथील ०३ अस्थायी पदांना दि.०१.१०.२०१८ ते दि.२८.०२.२०१९ या कालावधीकरिता मुदतवाढ देण्याचे शासनाच्या विचाराधिन होते.

**शासन निर्णय :-**

न्यायिक अधिकारी प्रशिक्षण संस्था, नागपूर येथील शासन निर्णय विधि व न्याय विभाग क्रमांक जेओटी-१०८०/३०१२/का.११, दिनांक ११/११/१९८७ अन्वये निर्माण करण्यात आलेली खालील पदे, संदर्भ क्र. १ च्या शासन निर्णयानुसार दिनांक ३०.०९.२०१८ पर्यन्त पुढे चालू ठेवण्यास मान्यता देण्यात आली होती. सदर पदांना दि. ०१.१०.२०१८ ते दि. २८.०२.२०१९ या कालावधीसाठी मुदतवाढ देण्यात येत आहे.

| अ.क्र. | पदनाम | पदांची संख्या |
|---|---|---|
| १ | संचालक | १ |
| २ | सह संचालक | २ |
| **एकूण पदे** | | **३** |

**२.** यावरील खर्च "मागणी क्र.जे-१, २०१४, न्यायदान (०५) (०१) न्यायिक अधिकारी प्रशिक्षण संस्था- (२०१४ ०२०७), (०१) वेतन" या शिर्षाखाली खर्ची टाकण्यात यावा व तो सन २०१८-२०१९ या वर्षात मंजूर झालेल्या अनुदानातून भागविण्यात यावा.

**३.** वित्त विभाग, शासन निर्णय क्र. पदनि-२०१६/प्र.क्र.८/१६/आ.पु.क., दि.०७.०९.२०१८ द्वारे प्रशासकीय विभागास प्रदान करण्यात आलेल्या अधिकारानुसार हा शासन निर्णय निर्गमित करण्यात येत आहे.

**४.** सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्यांचा संकेतांक २०१८१००४१२१७५४८३१२ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

**महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,**

Amogh Shyamkant Kaloti

Digitally signed by Amogh Shyamkant Kaloti
DN: CN = Amogh Shyamkant Kaloti, C = IN, S = Maharashtra, O = Government Of Maharashtra, OU = Law and Judiciary Department
Date: 2018.10.04 12:22:43 +05'30'

**(अ. श्या. कलोती)**
**विधि सल्लागार-नि-सह सचिव**

**प्रति:-**

१. महाप्रबंधक, उच्च न्यायालय, मुंबई,
२. प्रबंधक (निरिक्षणे), उच्च न्यायालय (अपील शाखा), मुंबई,
३. संचालक, न्यायिक अधिकारी प्रशिक्षण संस्था, नागपूर,
४. महालेखापाल -दोन (लेखापरीक्षा/लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र, नागपूर ,
५. जिल्हा कोषागार अधिकारी, नागपूर ,
६. वित्त विभाग/ व्यय-५,
७. विधी व न्याय विभाग कार्यासन-२३,२४ व २५,
८. निवड नस्ती